ॐ

रावसाहेब मल्लप्पा बसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ १४ वा

( रामेश्वरपंडितकृत )

# हरिहरतारतम्यम्.

हा

( महाराष्ट्रतात्पर्यासह )

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष

मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं

सोलापूर येथें

श्री सिद्धेश्वर छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली—प्रति १५००.

शके १८२६—सन १९०४.



किंमत ८ ४.

ॐ

रावसाहेब मल्लप्पा वसप्पा वारद यांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध होणारी वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथमाला.

ग्रंथ १४ वा

( रामेश्वरपंडितकृत )

# हरिहरतारतम्यम्.

हा

( महाराष्ट्रतात्पर्यासह )

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष

मल्लिकार्जुनशास्त्री

यांनीं

सोलापूर येथें

श्री सिद्धेश्वर छापखान्यांत छापवून प्रसिद्ध केला.

आवृत्ति १ ली—प्रति १५००.
शके १८२६—सन १९०४.



किंमत ०४.

# प्रस्तावना.

हें " हरिहरतारतम्य " नांवाचें लहानसें काव्य विद्वद्वर्य रामेश्वरपंडित नांवाचे कवींनीं केलें आहे. रामेश्वरपंडित हे पहिल्याप्रतीचे शिवभक्त होते तेव्हां त्यांनीं आपल्या उपास्य देवताच्या गुणांकडे लक्ष्य पुरविणें साहाजिकच आहे. ह्या काव्यांत विष्णुचरित्रांतील आणि शिवचरित्रांतील ज्या गोष्टी लोकांत प्रसिद्ध आहेत त्यांतीलच उदाहरणें दाखविलीं आहेत त्यांवरून शिव श्रेष्ठ किंवा विष्णु श्रेष्ठ ह्याचा शिवभक्त लोकांनींच विचार करावा ह्मणजे त्यांचे त्यांसच कळून येईल असा त्यांचा अभिप्राय आहे. शिव आणि विष्णु ह्यांचें खरें स्वरूप लोकांस समजण्याकरितां हें लहानसें काव्य करून त्यांत शिवाचा श्रेष्ठपणा दाखविला आहे. ह्या काव्याचे शंभर श्लोक असावेत असा समज आहे, कारण, शंभराला ९।६ कायते श्लोक कमी आहेत त्यावरून इतर जशीं शंभर शंभर श्लोकांचीं शतकें कोणीं कोणीं कवींनीं केलीं आहेत तसेंच हेंही एक शतक केलेलें असावें. कानडी टीकाकारानें शेवटीं कांहीं श्लोक द्विरुक्तीमुळें सोडून दिल्याचें लिहिलें आहे. असो. आह्मांस मिळालेल्या छापील कानडी पुस्तकांत इतकेच श्लोक छापलेले आढळले आणि त्यांत कोठें कोठें अशुद्धही आहे परंतु दुसरी हस्तलिखित प्रत न मिळाल्यामुळें आहे तेंच शुद्ध आणि पूर्ण आहे असें समजून आह्मीं आपल्या समजुतीप्रमाणें शक्य तितकें शुद्ध करून छापलें आहे.

ह्याचा मराठी अर्थ रा. रा. कृष्णाजी नारायण जोशी शास्त्री यांनीं केला आहे. कानडींतून मराठी तर्जुमा करून अर्थासह छापविण्याचा हा पाहिलाच प्रसंग आहे आणि कानडी छापील एका प्रती खेरीज दुसरी प्रत ताडून पाहण्यास नाहीं ह्यामुळें कोठें अशुद्ध राहिलेलें असेल तें कोणी कृपा करून क-

ळविल्यास पुढील आवृतीच्यावेळीं त्याचा विचार करण्यास बरें पडेल.

ह्याचा उपयोग शिवभक्त लोकांनीं करून घेतला ह्मणजेआह्मी आपल्या श्रमाचें सार्थक्य झालें असें समजूं.

प्रसिद्धिकर्ता.

---

## विनंति.

खालीं लिहिलेल्या वीरशैवलिंगिब्राह्मणधर्मग्रंथांपैकीं कोणत्याही पूर्ण अगर अपूर्ण ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती कोणाजवळ असल्यास त्यांनीं त्या आह्मांकडे अगर रा. सा. मल्लप्पा वसप्पा वारद यांचेकडे पाठवून देण्याची मेहेरबानी करावी, ह्मणजे धर्मग्रंथ छापण्याचे कामीं त्यांचा चांगला उपयोग होईल, व धर्मोन्नतीच्या कामीं त्यांनीं यथाशक्ति हात-भार लावल्याचें त्यांस श्रेयही मिळेल, त्या ग्रंथाचें काम संपतांच त्यांची मूळप्रत परत करूं व दोन छापील प्रतीही देऊं. आपली मूळप्रत परत मिळेल किंवा नाहीं ह्याची शंका वाटल्यास, त्यांनीं आपली मूळप्रत परत मिळण्याविषयीं आपल्या इच्छेप्रमाणें खात्री पटवून घेऊन मग आमचे-कडे ग्रंथ पाठवावें.

## अठ्ठावीस शैवागम.

| ग्रंथाचें नांव. | श्लोकसंख्या. | ग्रंथाचें नांव. | श्लोकसंख्या. |
|---|---|---|---|
| १ कामिकागम | १ परार्ध | १६ रौरवागम | १० कोटि. |
| २ योगजागम | १ लक्ष | १७ मुकुटागम | १ लक्ष |
| ३ चिंत्यागम | १ लक्ष | १८ विमलागम | ३ लक्ष |
| ४ कारणागम | १ कोटि | १९ चंद्रज्ञानागम | कोटि |
| ५ अजितागम | १ लक्ष | २० बिंबागम | १ लक्ष |
| ६ दीप्तागम | १ लक्ष | २१ प्रोद्गीतागम | ३ लक्ष |
| ७ सूक्ष्मागम | १ पद्म | २२ ललितागम | ८ लक्ष |
| ८ सहस्रागम | १ शंख | २३ सिद्धागम | ५० लक्ष |
| ९ अंशुमानागम | १० लक्ष | २४ संतानागम | ६ लक्ष |
| १० सुप्रबोधागम | ३ कोटि | २५ सर्वोक्तागम | २ लक्ष |
| ११ विजयागम | ३ कोटि | २६ पारमेश्वरागम | १२ लक्ष |
| १२ निश्वासागम | १ कोटि | २७ किरणागम | ५ कोटि |
| १३ स्वायंभुवागम | ३ कोटि ५० ल. | २८ वातुलागम | १ लक्ष |
| १४ अनिलागम | ३ लक्ष | | |
| १५ वीरागम | १ लक्ष | | |

* यांपैकीं प्रत्येक आगमांतील श्लोकसंख्या वातुलागमांतून घेतली आहे.

## आगमांशिवाय इतर ग्रंथ.

१ श्रीरेणुकभाष्य.
२ श्रुतिसारभाष्य.
३ सोमनाथभाष्य.
४ सर्वेश्वरभाष्य.
५ चोळरेणुकभाष्य.
६ रेणुकचरित्र.
७ वीरमाहेश्वराचारसंग्रह.
८ वीरमाहेश्वराधिक्य.
९ वीरशैवाचारकौस्तुभ.
१० वीरशैवरत्नाकर.
११ वीरशैवप्रकाशिका.
१२ वीरशैवोत्कर्षप्रकाशिका.
१३ वीरशैवानंदचंद्रिका.
१४ वीरशैवप्रदीपिका (शिवज्ञान-शेखर.)
१५ शिवाद्वैतमंजरी.
१६ पंडितार्यचारित्र.
१७ मरुलसिद्धचारित्र.
१८ रेवणसिद्धचारित्र.
१९ क्रियासार.
२० कैवल्यसार.
२१ बसवराजीय.
२२ माचिदेवमनोविलास.
२३ वीरशैवचिंतामणि.
२४ शिवतत्वचिंतामणि.
२५ वीरशैवसंजीवनी
२६ निराभारसंग्रह.
२७ षट्स्थलतिलक.
२८ प्रसंगरत्नाकर.
२९ षट्स्थलचंद्रिका.
३० शिवज्ञानप्रदीपिका.
३१ शांभवसार.
३२ शिवतत्वतर्कचंद्रिका.
३३ लिंगधारणचंद्रिका.
३४ शिवाद्वैतप्रदीपिका.
३५ सिद्धांतशेखर.
३६ विशेषार्थप्रकाशिका.
३७ अनादिवीरशैवसंग्रह.
३८ धर्मसंग्रह.
३९ शिवधर्मोत्तर.
४० वीरशैवमहोदधि.
४१ कथाडंबर.
४२ नंदीरहस्य.

ह्यांपैकीं कोणास ग्रंथ आमचे-कडे पाठविणें झाल्यास खालील पत्यावर पाठवावे.

वेदमूर्ति मणूरमठाध्यक्ष
मल्लिकार्जुन शास्त्री,
यांस वारदांचे येथें.
सोलापूर.

# शुद्धिपत्रिका.

| पृ. | पं. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | २० | विष्णू | विष्णु |
| ५ | १९ | साखे | सारखे |
| ६ | १५ | करून | करून खरें |
| ” | १६ | त्याला | त्यालाच |
| ” | २२ | करून | करून. खरें |
| १५ | ११ | दुसऱ्या | दुसऱ्याची |
| २२ | १३ | महादेब | महादेव |
| २३ | २२ | काळे | काळें |

॥ श्रीः ॥

## ॥ श्रीसदाशिवमूर्तये नमः ॥

### हरिहरतारतम्यप्रारंभः

वृद्धान् श्रुतिस्मृतिपुराणविशेषभाषान् निःशंकबुद्धि-कुशलान् प्रणिपत्य नित्यम् ॥ अद्वैतमेकमभजं श्रितभेदबुद्धिः पृच्छाम्यहं हरिहरास्थिततारतम्यम् ॥ १ ॥

॥ श्री सांबसदाशिवास नमस्कार असो. १. हे वृद्ध वृद्ध सभ्य गृहस्थहो, आपण वेद, शास्त्र, पुराण आणि अनेक प्रकारच्या भाषा जाणतां, तुह्मी लोकांच्या मनांत संशय आले तर ते दूर करण्यांत मोठे कुशल आहां, तुह्मांला मी नमस्कार करून असें विचारतों कीं, मी ज्याला द्वैतभाव नाहीं अशा एका देवाला ने-हमीं भजतों, परंतु त्यांत हरी मोठा किंवा हर मोठा असा सं-शय आल्यावरून त्या दोघांत ( विष्णूंत आणि शिवांत ) मोठा कोण? हें मला समजत नाहीं तर आपण मला श्रेष्ठ त्यांत कोण तें सांगा.

एकः समुद्रसलिले वटपत्रशायी त्वन्यः समुद्रशराधिस्त्रि-पुरप्रभेदे ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु त-मिमं वयमाश्रयामः ॥ २ ॥

२. विष्णू आणि शिवापैकीं एकजण [ विष्णु ] प्रलय-काळच्या वेळीं समुद्राच्या पाण्यांत वडाच्या पानावर निजतो, व दुसरा [ शंकर ] त्रिपुरासुराचा नाश करतेवेळीं समुद्राचा बाण-भाता करितो, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं ( त्यालाच शरण जाऊं. )

एको भुजंगशयने स्वपतीह नित्यमन्यो भुजंगकटको नटतीह नित्यम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३ ॥

३ एकजण [ विष्णु ] दररोज सर्पाच्या बिछान्यावर ( शेषावर ) येथें निजतो, व दुसरा ( शिव ) सर्पाचे अलंकार [ कडेतोडे ] घालून दररोज येथें नाचतों, तेव्हां वृद्धहो, ह्या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकः पुनर्भुवि दधौ नवनीतखंडमन्यो दधौ नवसुधामयचंद्रखंडम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४ ॥

४ एकजण [ विष्णु ] पृथ्वीवर जन्म घेऊन गोकुळांत कृष्णावतारांत थोडथोडें लोणी चोरतो, आणि दुसरा ( शिव ) ताजें अमृत ज्यांत भरलें आहे अशा चंद्राच्या कलेस आपले मस्तकावर घेतो. तेव्हां या दोघांत श्रेष्ठ कोण? हें तुम्ही विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

सूनुं चकार चतुराननमेव एकः सूतं चकार चतुराननमेव चान्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५ ॥

५. एकजण ( विष्णु ) ब्रह्मदेवाला आपला मुलगा म्हणून सृष्टि उत्पन्न करण्याकरितां उत्पन्न करितो, आणि दुसरा ( शिव ) त्याच ब्रह्मदेवाला त्रिपुरासुरास मारावयाच्यावेळीं पृथ्वीचा रथ करून त्यावर सारथी करितो. तेव्हां या दोघांत श्रेष्ठ कोण? हें तुम्ही विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकोऽस्ति नंदकुटिलव्रजमंदिरेषु त्वन्योऽस्ति मेरुशिखर-

स्थितर्कंदरेषु ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६ ॥

६. एकजण [ विष्णु ] नंदाच्या खेडेगांवासारख्या गोकुळांतील घरांत राहतो, व दुसरा ( शिव ) मेरुपर्वताच्या शिखरावरील गुहांत राहतो. तेव्हां या दोघांत श्रेष्ठ कोण? हें तुह्मी विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः सहस्रकमलैर्यमुपार्च्य तस्थावन्यस्तु तैरुपचितः सह मोदते स्म ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७ ॥

७ एकजण ( विष्णु ) हजार कमलांनीं दुसऱ्याची ( शिवाची ) पूजा करून राहतो व दुसरा ( शिव ) विष्णूनें कमलांनीं केलेली पूजा स्वीकार करून त्याचे वरोबर सुखानें राहतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

गाढांधकारघननीलशरीर एको ज्योत्स्नातिनिर्मलविशुद्धशरीर अन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८ ॥

८. एकजण [ विष्णु ] काळ्याभोर ढगासारखा श्यामवर्ण आहे, आणि दुसरा ( शिव ) स्वच्छ चांदण्यासारखा गौरवर्ण आहे तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें तुह्मी विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकः कुमारमभजत्सुतरामनंगमन्यः प्रयाति किल शक्तिधरं कुमारम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ९ ॥

९. एकाला ( विष्णूला ) ज्याला अंग देखील नाहीं अ-

सा प्रद्युम्न [ मन्मथ ] नांवाचा मुलगा आहे, आणि दुसऱ्याला [ शिवाला ] महा बलाढ्य हातांत शक्ति नांवाचें आयुध घेणारा कार्तिकस्वामी नांवाचा मुलगा आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

**स्त्रीरूपमाप किल पूर्वमभीष्टमेकस्त्वन्यस्तमेवमभजत्पुरुषस्य रत्या ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १० ॥**

१०. एकजणानें [ विष्णूनें ] पूर्वीं आपल्या आवडीचें बायकोचें रूप घेतलें व दुसऱ्यानें ( शिवानें ) त्या स्त्रीरूप घेणाऱ्या विष्णूचा पुरुषशरीरानें उपभोग घेतला, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

**मुष्णाति बल्लवगृहे नवनीतमेकस्त्वन्यो ददाति सुधियां परमामृतं तत् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ११ ॥**

११. एकजण [ विष्णु ] गौळवाड्यांत लोणी चोरतो, व दुसरा ( शिव ) चांगली बुद्धि असणाऱ्यांस ( साधूंस ) परमामृत ( उत्तम मोक्ष ) देतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं ( त्यालाच शरण जाऊं. )

**एकः प्रयाति हि सकाम इति प्रसिद्धिमन्यो तथा निहतकाम इति प्रसिद्धिम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १२ ॥**

१२. एकजण (विष्णु) मदनाच्या स्वाधीन झालेला (का-

मातुर, विषयीं ) ह्मणून लोकांत प्रसिद्ध आहे, आणि दुसरा ( शिव ) मदनास जाळून टाकणारा ह्मणून लोकांत प्रसिद्ध आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य जात इति संततलोकवार्ता नान्यस्य तादृशविदूषितदोषवार्ता ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १३ ॥

१३. एकजण ( विष्णु ) जन्म घेतो ह्मणून नेहमीं लोकांत बोलवा आहे ( विष्णूनें जन्म घेतल्याची लोकांत प्रासिद्धि आहे ) दुसऱ्या (शिवाची) अशा तऱ्हेनें जन्म घेतल्याची लोकदूषित वार्ता नाहीं. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें तुह्मी विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य वार्धुषिकजीवनवृत्तिरासीदन्यस्य चापि बहुभाग्यदवृत्तिरासीत् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १४ ॥

१४. एकजण [ विष्णु ] व्याजबट्ट्यावर आपला चरितार्थ करितो [ भक्तानें अगोदर सेवा केली तर त्या मानानें भक्तांस फळ देतो हें त्याचें करणें मुद्दल रुपयांचें हिशेबानें व्याज देण्यासारखें आहे ] दुसरा ( शिव ) आपल्या भक्तांस थोड्या सेवेनें अतिशय ऐश्वर्य देणारा असा उदार स्वभावाचा आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु बाणगतिमेत्य करव्रणोऽभूत्त्वन्योऽक्षिपत्पुरजयाय तमेव बाणम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं

वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १५ ॥

१५. एकजणाला [ विष्णूला ] बाण मारून मारून हा-तास वट्टा पडला आहे त्याच विष्णूस दुसऱ्या [ शिवानें ] त्रि-पुरावर बाण ह्मणून सोडतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको विभाति रविचंद्रमयद्विनेत्रस्त्वन्यो रवींदुशिखि-रूपघनत्रिनेत्रः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १६ ॥

१६. एकाचा [ विष्णूचा ] उजवा डोळा सूर्य व डावा डोळा चंद्र आहे, व दुसऱ्याचा ( शिवाचा ) उजवा डोळा सूर्य व डावा डोळा चंद्र असून शिवास कपाळावर अग्नि नांवाचा ति-सरा फारच तेजस्वी असा डोळा आहे ह्मणून त्याला त्रिनेत्र ह्मणतात तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्याला शरण जाऊं. )

एकः सदा सवितृमंडलमध्यवर्ती चान्यः सदा सवि-तृदंतभिदापटीयः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १७ ॥

१७. एकजण [ विष्णु ] सूर्यमंडलाच्या मध्यभागीं राहतो व दुसऱ्यानें [ शिवानें ] सूर्याचे दांत पाडून टाकिले आहेत. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु दीनगजरक्षणदत्तबुद्धिस्त्वन्यस्तु मत्तगजशिक्षण-दत्तबुद्धिः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १८ ॥

१८. एकजण [ विष्णु ] नक्रानें धरल्यामुळें दीन ( ह-

तवीर्य ) झालेल्या हत्तीचें रक्षण करण्याकडे आपली बुद्धि खर्च करतो व दुसरा ( शिव ) मदोन्मत्त झालेल्या गजासुराला शिक्षण देण्याची उमेद बाळगतो तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

**गोपालकत्वमधिगम्य विभाति चैकस्त्वन्यो वृषाधिपतिनायक इत्यगादि ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ १९ ॥**

१९. एकजण ( विष्णु ) गोकुळांत गुराखीपणा स्वीकारून शोभतो [ राहतो ] व दुसरा ( शिव ) वृषाचा ( नंदीचा ) मालक असें ह्मणवून घेतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं ( त्यालाच शरण जाऊं. )

**ब्रह्माणमाप निजनाभिसरोज एकोऽन्यो ब्रह्मणो नखमुखेन शिरश्चकर्त ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २० ॥**

२०. एकानें (विष्णूनें) आपल्या नाभिकमलापासून ब्रह्मदेवास उत्पन्न केलें व दुसऱ्यानें ( शिवानें )नखांच्या शेवटांनीं ब्रह्मदेवाचें मस्तक तोडिलें तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

**विश्वैकदेशवसतिर्भुदमेति चैको विश्वेश्वरोऽयमिति याति हि कीर्तिमन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २१ ॥**

२१. एकजण ( विष्णु ) पृथ्वीच्या एका भागांत राहतो

व तेवढ्यानेंच संतोष मानतो व दुसरा ( शिव ) सर्व विश्वाचा प्रभु आहे अशी त्याची कीर्ति वरचेवर वाढत आहे तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं ( त्यालाच शरण जाऊं. )

**एकोऽस्ति केशव इति प्रथितस्तु लोकेऽन्यो व्योमकेश इति याति जगत्प्रसिद्धिम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २२ ॥**

२२. एकजण [ विष्णु ] केशव ह्या नांवानें लोकांत प्रसिद्ध आहे दुसरा [ शिव ] व्योमकेश ह्या नांवानें लोकांत प्रसिद्ध आहे तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

**एकः समक्ष्युदहराभिजमब्जपूर्त्यै त्वन्यस्तदा नयनमस्य ददौ च चक्रम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २३ ॥**

२३. एकजण [ विष्णु ] आपल्यावर शिवाची कृपा व्हावी ह्मणून हजार कमलें शिवास वाहतो त्यांत एक कमल कमी पडलें तेव्हां आपला एक नेत्र कमल ह्मणुन अर्पण करितो तेव्हां दुसरा ( शिव ) त्याच विष्णूस प्रसन्न होऊन नेत्रकमल आणि सुदर्शनचक्र देतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

**एको ह्यगाधलुठदब्धिजले निमग्नः कैलासशैलशिखरे खलु वर्ततेऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २४ ॥**

२४. एकजण ( विष्णु ) क्षीरसमुद्राच्या खोल पाण्यांत जा-

ऊन बुडून बसतो व दुसरा [ शिव ] कैलासपर्वताच्या शिखरावर उंच ठिकाणीं राहतो तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं.)

एकः सुरैरुपगिरं हि तपश्चकार तस्मै ददौ सुतमधोक्षितिसांबमन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २५ ॥

२५. एकजण [ विष्णु ] इतर देवगणांसहवर्तमान पर्वताच्या जवळ तप करितो आणि दुसरा [ शिव ] त्याच तपाला प्रसन्न होऊन त्यास पृथ्वीवर सांब नांवाचा मुलगा देतो तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकस्तु नैल्यमुपयाति शरीरमात्रे त्वन्यस्तु नैल्यमुपयच्छति कंठमात्रे ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २६ ॥

२६ एकाचें ( विष्णूचें ) सर्व शरीर निळें ( शामवर्ण ) आहे व दुसऱ्याचा ( शिवाचा ) गळा मात्र निळा ( शामवर्ण ) आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजें आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः प्रसिद्धिमिह धेनुवधं विधाय व्याघ्रं निहत्य नितरामितरः प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २७ ॥

२७. एकजण [ विष्णु ] धेनूचा [ धेनुकासुराचा ] वध करून प्रसिद्धीस आला व दुसरा ( शिव ) वाघाचा ( व्याघ्रासुराचा ) वध करून प्रसिद्धीस आला, तेव्हां या दोघांत अधिक

कोण? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आ-श्रय करूं. (त्यालाच शरण जाऊं.)

एकः सदाष्टमहिषीरुपयाति शीघ्रमन्यो बिभर्ति नितरामपि चाष्टमूर्तिम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २८ ॥

२८. एकजण (विष्णु) आठ मुख्य मुख्य स्त्रियांच्या सहवासांत नेहमीं असतो, व दुसरा [शिव] आपणच स्वतः अ-ष्टमूर्ति (पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, सूर्य, चंद्र व यज-मान ह्या अष्टमूर्ति) धारण करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं (त्यालाच शरण जाऊं.)

एकः सुवर्णवसनं विदधाति कट्यामन्यः सुवर्णगिरिचापमधात्कराग्रे ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ २९ ॥

२९. एकजण [विष्णु] आपल्या कमरेला सोनेरी वस्त्रं (पिंवळा पितांबर) नेसतो, व दुसरा (शिव) आपल्या ह्म-तांत मेरुपर्वताचें (सुवर्णपर्वताचें) धनुष्य घेतो, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्या-चाच आश्रय करूं (त्यालाच शरण जाऊं.)

एको दधौ शिरसि बर्हिणपिच्छमात्रमन्यो मयूरवरवाहनपुत्रदृष्टिः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३० ॥

३०. एकजण (विष्णु) आपल्या मस्तकावर मोरांच्या पिसाऱ्याचा तुरा खोंवून गाईच्यामागें फिरतो व दुसरा [शिव] उत्तम मोरावर बसणाऱ्या कार्तिकस्वामीकडे कृपादृष्टीनें पाहतो-

तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको दधाति हृदि कौस्तुभरत्नमेकमन्यः सहस्रफणिरत्नमहींद्रहारम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३१ ॥

३१. एकजण [ विष्णु ] आपल्या उरावर ( वक्षःस्थलावर ) फक्त कौस्तुभमणीच धारण करितो, व दुसरा [ शिव ] ज्याच्या हजार फणांवर हजार रत्नें आहेत अशा शेषसर्पाची माळा करून आपल्या कंठांत घालतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

इंद्रानुजत्वत उपेंद्र इतीड्य एक इंद्रादिभिः सुरगणैः परिपूज्यतेऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३२ ॥

३२. एकजण ( विष्णु ) तो इंद्राचा धाकटा भाऊ आहे ह्मणून त्यास उपेंद्र ह्मणतात व तो इंद्राचा धाकटा भाऊ ह्मणूनच लोकांत मानमान्यतेस पात्र होतो, आणि दुसऱ्या ( शिवाची ) इंद्रादिक सर्व देव पूजा करितात. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

लक्ष्मीं वहन्नपि च वांछति वित्तमेको भिक्षामटन्नपि च यच्छति भाग्यमन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३३ ॥

३३. एकाची ( विष्णूची ) प्रत्यक्ष लक्ष्मी बायको असून पुनः द्रव्य मिळण्याची तो आशा करितो व दुसरा ( शिव ) स्वतः भिक्षा मा-

गतो तरी आपल्या भक्तांस अमर्याद ऐश्वर्य देतो; तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः करेण धृतवानिह पांचजन्यमन्यस्तथैव बहुविश्वसृजः कपालम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३४ ॥

३४. एकजण ( विष्णु ) आपल्या हातांत पांचजन्य नांवाचा शंख घेतो व दुसरा ( शिव ) आपल्या हातांत ब्रह्मकपाल घेतो; तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकस्तु माधव इति प्रथितः स्वनाम्ना त्वन्यो ह्युमाधव इति प्रथितः स्वनाम्ना ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३५ ॥

३५. एकास ( विष्णूस ) माधव ( लक्ष्मीचा पति ) असें म्हणतात व दुसऱ्यास [ शिवास ] उमाधव [ पार्वतीचा पति ] असें म्हणतात, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

वृंदावने चरति गोभिरुपेत्य चैको त्वन्यो भृशं पितृवने चरतीह भूतैः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३६ ॥

३६. एकजण ( विष्णु ) वनांत गाई चारण्यास नेऊन त्यांबरोबर वृंदावनांत सुखानें राहतो, व दुसरा [ शिव ] स्मशानभूमींत भूतप्रेतपिशाचांबरोबर सुखानें कालक्रमण करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः कदापि मधुमात्रहृतिं चकार त्वन्यो महाविषहृतिं च तथा चकार ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३७ ॥

३७. एकानें ( विष्णूनें ) एकवेळ मधुदैत्याचा मात्र वध केला, [ मधच मात्र खाल्ला ] व दुसऱ्यानें ( शिवानें ) भयंकर कालकूट विष प्राशन केलें. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु कैटभवधे निपुणस्तथैवमन्यस्तु मृत्युहनने निपुणो नितांतम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३८ ॥

३८. एकजणानें ( विष्णूनें ) कैटभदैत्यास मारण्याचे कामांत प्रवीणता दाखविली व दुसऱ्यानें ( शिवानें ) यमास मारण्याचे कामांत प्रवीणता दाखविली. एकानें कैटभास मारलें व एकानें यमास शिक्षा केली. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको व्रजेषु कुरुते मृदुवेणुनादमन्यो लयेषु कुरुते विकटाट्टहासम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ३९ ॥

३९. एकजण [ विष्णु ] गोकुळांत वृंदावनांत जाऊन मधुर वेणूचा आवाज करितो ( वाजवितो ) दुसरा [ शिव ] प्रलयकाळीं सर्व जगाचा संहार करावयाच्या वेळेस भयंकर अट्टहास ( मोठमोठ्या आरोळ्या ) करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा म्हणजे आम्ही त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

पक्षींद्रवाहन इति प्रथितोऽयमेकस्त्वन्यो महोक्षवरवाहन इत्यभाणि ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४० ॥

४०. एकाचें [ विष्णूचें ] गरुड वाहन (बसावयाचा पक्षी ) आहे आणि दुसऱ्याचें [ शिवाचें ] नंदिकेश्वर वाहन आहे तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु योनिज इति ह्यगमत्प्रसिद्धिमन्यस्त्वजात इति याति जगत्प्रसिद्धिम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४१ ॥

४१. एकजण [ विष्णु ] योनींतून जन्म पावला ह्मणून प्रसिद्ध आहे व दुसरा ( शिव ) अयोनिसंभव आहे ह्मणून प्रसिद्ध आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्त्वनित्य इति सुप्रथितो जगत्यामन्यस्तु नित्य इति शंसति लोकसिद्धिः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४२ ॥

४२. एकजण ( विष्णु ) अनित्य ( जन्म मरण घेण्यामुळें ) चिरकाल राहणारा नाहीं, दुसरा [ शिव ] नित्य ( चिरकाल राहणारा आहे, ) तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको ह्युलूखलनिबद्ध इति प्रसिद्धस्त्वन्यो विमुक्तभवपाश इति प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४३ ॥

४३. एकाला [ विष्णूला ] उखळाला लहानपणीं त्याच्या

आईनें कृष्णावतारांत ( यशोदेनें ) बांधून ठेविलें होतें ह्मणून प्रसिद्धि आहे, आणि दुसऱ्याचे (शिवाचे) संसारपाश तुटलेले आहेत (त्यानें संसारपाश तोडून टाकिले आहेत, ह्मणून प्रसिद्धि आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु पार्थरथवाजिकृतोपचारस्त्वन्यस्तु पार्थसमरप्रणुतप्रभावः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४४ ॥

४४. एकजण [ विष्णु ] अर्जुनाच्या रथाच्या घोड्यांची सेवा चाकरी करितो [ सारथी होतो ] व दुसऱ्या ( शिवाची ) प्रत्यक्ष अर्जुन युद्धभूमीवर नमस्कार करून पराक्रमाची प्रशंसा करितो, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको जनार्दन इति प्रकटीकृतोऽयमन्यस्तु शंकर इति स्फुटमीड्यते स्म ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४५ ॥

४५. एकाचें [ विष्णूचें ] जनार्दन ( लोकांस पीडा देणारा ) अशा अर्थाचें नांव प्रसिद्ध आहे व दुसऱ्याचें ( शिवाचें ) शंकर ( लोकांचें कल्याण करणारा ) अशा अर्थाचें नांव प्रसिद्ध आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं, ( त्यालाच शरण जाऊं. )

भक्तं बलिं पुनरधःकृतवानिहैको भक्तं कुबेरमधिकश्रियमाधृतोऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४६ ॥

४६. एकजण ( विष्णु ) आपली मनोभावानें भक्ति कर-

णाऱ्या भक्तास उलट पातालांत घालतो व दुसरा ( शिव ) आपल्या भक्ताला कुबेराला अतोनात संपत्ति देऊन त्याचा लौकिक वाढवितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

व्याधादिनीचहृतनैजवधूक एको व्याधायितोऽपि निगमैरभिराश्रितोऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४७ ॥

४७. एकाच्या ( विष्णूच्या ) तो निजधामास गेल्यावर अर्जुन द्वारकेहून कृष्णाच्या सर्व बायका घेऊन हस्तनापुरास जाण्यास निघाला असतां निबिड अरण्यांत भिल्ल कोळी वगैरे अडाणी जातीच्या दांडगेश्वर लोकांनीं सर्व बायका चोरून नेल्या. व दुसऱ्या [ शिवानें ] अर्जुनाची भक्ति पाहण्याकरितां भिल्लाचें रूप घेतलें होतें तरी त्याची वेदादिकांनीं देखील त्यावेळीं स्तुति केली. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य सेवकजना भृशदग्धगात्रा ह्यन्यस्य सेवकजनाः सविभूतिरेखाः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४८ ॥

४८. एकाचें ( विष्णूचे ) भक्तलोक त्याची कृपा होण्याकरितां तप्त मुद्रा धारण करून आपलीं शरीरें जाळून घेतात, व दुसऱ्याचे ( शिवाचे ) भक्तलोक आपल्या कपाळावर व अंगावर विभूतीचे पट्टे ओढतात व त्यामुळें सुशोभित दिसतात. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको दधौ सितमृदं तिलकं ललाटे त्वन्यो दधौ हुतवहं तिलकं ललाटे ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ४९ ॥

४९. एकजण (विष्णु) पांढऱ्या मातीचा [गोपीचंदनाचा] आपले कपाळास टिळा लावतो व दुसरा (शिव) आपल्या कपाळावर प्रत्यक्ष धगधगीत अग्नीच धारण करितो, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एको दधाति तुलसीकृतमालिकां ह्यन्यो दधाविति विधातृकपालमालाम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५० ॥

५०. एकजण ( विष्णु ) आपल्या गळ्यांत उरापर्यंत लोंबणारी तुळशीची माळा घालतो व दुसरा ( शिव ) आपल्या गळ्यांत ब्रह्मकपालांची माला घालतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

गोपालकैरनुसृतः सुतरामिहैको दिक्पालकैरनुसृतस्तु दिगंबरोऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५१ ॥

५१. एकजण ( विष्णु ) गोकुळांत गुराख्यांच्या सहवासांत नेहमीं काळ घालवितो व दुसरा ( शिव ) दिगंबर रूप घेऊन अष्टदिक्पालांच्या सहवासांत काळ घालवितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको गिलत्यनुदिनं नवनीतमेवमन्यो गिलत्यतिभयंकरकालकूटम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं

वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५२ ॥

५२. एकजण [ विष्णु ] दररोज गोकुलांत नंदाच्या घरीं लोणी खातो व दुसरा ( शिव ) समुद्रमंथनाच्यावेळीं उत्पन्न झालेल्या विषानें सर्व लोक जळून जाऊं लागले त्यांचा त्रास चुकविण्याकरितां देवांच्या विनंतीवरून तें भयंकर कालकूट विष पिऊन टाकतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एको मृगाभिलषितो गहने चचार ह्यन्यो मृगं करतलेन वहंश्चचार ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५३ ॥

५३. एकजण ( विष्णु ) रामावतारांत हरिण मारण्याकरितां त्याचे मागें लागून रानोरान फिरतो व दुसरा ( शिव ) आपल्या एका हातांत हरिण धरूनच उभा आहे, त्याला हरिणाकरितां विष्णूप्रमाणें रानोमाळ धांवावें लागलें नाहीं. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको दशास्यहृतनैजवधूक आसीदन्यो वधूविलसितार्धशरीर आसीत् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५४ ॥

५४. एकाची [ विष्णूची ] रामावतारांत रावणानें बायको चोरून नेली व दुसरा ( शिव ) आपल्या बायकोस आपल्या अर्धांगांत जागा देऊन ( अर्ध शरीर पुरुष व अर्ध शरीर स्त्री असा एक रूप होऊन ) सुखानें राहत [ शोभत ] आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु शैलनिचयैः शरधिं बबंध ह्यन्यस्तमेव शरधिं त्रिपुरे चकार ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५५ ॥

५५. एकजण ( विष्णु ) पर्वतांच्या ओळींच्याओळी सारल्या लाऊन समुद्रावर रामावतारांत सेतु बांधतो व दुसरा ( शिव ) त्रिपुरासुरांच्या युद्धाच्यावेळीं त्याच समुद्राला आपला बाण ठेवण्याचा भाता करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा. ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकस्तु मर्कटभटेन ददाह लंकां ह्यन्यः करेण च ददाह पुरत्रयं तत् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५६ ॥

५६. एकजण [ विष्णु ] रामावतारांत माकडांच्या योध्यांकडून रावणाची लंका जाळवितो व दुसरा ( शिव ) स्वतः आपल्या हातानें त्रिपुरें जाळून टाकतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु मर्कटभटैर्निजकार्यकारी ह्यन्यः सुरेंद्रनिवहैर्निजकार्यकारी ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५७ ॥

५७. एकजण ( विष्णु ) रामावतारांत माकडांच्या शूर शूर योध्यांच्या ( सुग्रीवादिकांच्या ) साह्यानें आपलें काम करून घेतो. व दुसरा ( शिव ) इंद्रादिक मुख्य मुख्य देवांचे समुदाय आपले मदतीस घेऊन आपलें काम करून घेतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको विवेश सरयूसलिलांतराले त्वन्यो दधौ त्रिपथगां कणवज्जटायाम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः

सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५८ ॥

५८. एकजण ( विष्णु ) रामावतारांत देहत्याग करावयाच्या-वेळीं अयोध्येंतील सर्व लोकांसहवर्तमान सरयू नदीमध्यें प्रवेश करितो व दुसरा [ शिव ] प्रत्यक्ष परम पावन अशा भागीरथीस आपल्या जटांत एका पाण्याच्या थेंबासारखी नेहमीं धारण करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः शिवं जगति पूजयति स्म सेतौ रामेश्वरोऽद्य तु जनैः परिदृश्यतेऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ५९ ॥

५९. एकजण ( विष्णु ) रामावतारांत सेतुबंधनाच्यावेळीं शिवाची पूजा करितो व दुसरा [ शिव ] रामानें (विष्णूनें) सेतूवर स्थापन करून पूजन केलेला रामेश्वर ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला लोकांच्या प्रत्यक्ष पाहण्यांत येत आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु मत्स्यतनुमेत्य गतोऽब्धितोये ह्यन्यस्तु मत्स्यकलितध्वजभक् प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६० ॥

६०. एकजण [ विष्णु ] मत्स्यावतारांत माशाचें रूप घेऊन समुद्रांत लपून राहिलेल्या दैत्यास मारण्याकरितां समुद्रांत शिरला व दुसरा ( शिव ) त्याच माशाचा ध्वज असणाऱ्या ( मीनध्वजास ) मदनास जाळून टाकितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको नृसिंहतनुमेत्य जघान दैत्यमन्यस्तमेव हतवान् शरभावतारे ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६१ ॥

६१. एकजण [ विष्णु ] हिरण्यकशिपु नांवाच्या एका दैत्यास मारण्याकरितां नृसिंहाचा अवतार घेऊन त्यास मारितो व दुसरा ( शिव ) तर शरभावतार घेऊन त्याच नृसिंहाचा पराभव ( नाश ) करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको वटुः कपट इत्यखिलैरभाणि विद्यागुरुस्त्वपर इत्यखिलैरभाणि ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६२ ॥

६२. एकजण [ विष्णु ] वामनावतारांत कपटरूपानें बटूचें ( ब्रह्मचारीचें ) रूप घेऊन बळीसारख्या दात्यास फसवितो ह्मणून सगळे लोक ह्मणतात व दुसरा ( शिव ) तर प्रत्यक्ष विद्यागुरु ज्ञानदायक आहे असें सगळे लोक ह्मणतात. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकोऽपि चौर्यकृतवानिह ताटकां स्त्रीमन्यो जघान हि मदांधकराक्षसेंद्रम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६३ ॥

६३. एकजणानें [ विष्णूनें ] बायकांस जिवें मारूं नये असें धर्मशास्त्र सांगत असतां रामावतारांत कपटानें ( चोरून ) ताटका नांवाचे राक्षसीस जिवें मारिलें, आणि दुसऱ्यानें ( शिवानें ) मदोन्मत्त झालेल्या अंधक नांवाच्या राक्षसास मारिलें. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य रावणवधेऽस्ति ह्रदासिशक्तिरन्यस्य संर्धमिल-

येऽपि हि चास्ति शक्तिः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६४ ॥

६४. एकाला ( विष्णूला ) रावणाला मारण्यापुरतेंच तरवारीचें बळ होतें व दुसरा ( शिव ) सर्व त्रैलोक्याचा एका क्षणांत क्षय करण्याला समर्थ आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः प्रसिद्ध इह संप्रति वासुदेवो देवो महानिति सदा च ततः प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६५ ॥

६५. एकजण ( विष्णु ) हल्लीं वासुदेव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे व दुसरा ( शिव ) महादेव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकः पदेन शकटं सहसा नुनोद ह्यन्यः पदांगुलिनखेन गिरिं नुनोद ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६६ ॥

६६. एकानें ( विष्णूनें ) एकवेळ पायानें शकटास [ शकटासुर नांवाच्या दैत्यास ] सहज लांबवर झोंकून दिलें व दुसऱ्यानें ( शिवानें ) पायाच्या बोटाच्या नखानें पर्वतास दूर फेंकलें. ( हालविलें ) तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकः पदत्रयमितं त्रिजगच्चकार ह्यन्यः पदाहतिहतं त्रिजगच्चकार ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु

तमिमं वयमाश्रयामः ॥ ६७ ॥

६७. एकानें ( विष्णूनें ) वामनावतारांत बलीस दान मागतेवेळीं दानोदक हातावर पडतांच त्रिविक्रमरूप घेऊन दोन पावलांनीं स्वर्ग, मृत्यु व पाताळ झांकून तिसरा पाय बलीच्या मस्तकावर दिला अशा तऱ्हेनें सरासरी तीन पावला इतकें त्रैलोक्य आहे असें दाखविलें, आणि दुसऱ्यानें ( शिवानें ) प्रलयकाळाच्या वेळीं एका लाथेसरसा सर्व त्रैलोक्याचा नाश केला. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य रूपमधिगच्छति तामसत्वमन्यस्य रूपमधिगच्छति सात्विकत्वम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६८ ॥

६८. एकाचें ( विष्णूचें ) तामसरूप आहे, व दुसऱ्याचें [ शंकराचें ] शुद्ध सात्विकरूप आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

नीलोऽपि नीलयमुनाजलमग्न एकः शुभ्रोऽपि शुभ्रतरदिव्यधुनीधरोऽन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ६९ ॥

६९. एकजण ( विष्णु ) स्वतः श्यामवर्ण ( काळा ) असून पुनः कालियामर्दनाच्या वेळीं काळे पाणी असणाऱ्या यमुनानदींत बुडून बसला होता, व दुसरा ( शिव ) स्वतः गौरवर्ण असून पांढरें पाणी असणाऱ्या भागीरथीनदीला आपल्या मस्तकावर धारण करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच श-

रण जाऊं. )

एकस्य सूनुरपि नेत्रकृशानुदग्धो ह्यन्यस्य वत्स उदितः खलु शाश्वतायुः ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७० ॥

७०. एकाचा ( विष्णूचा ) मुलगा कृष्णावतारांत प्रद्युम्न झाला तो मदनाचा अवतार असल्यामुळें तो पूर्वी शंकराच्या तृतीय नेत्राच्या ज्वालेनें जळाला होता, व दुसऱ्याचा ( शिवाचा ) वत्स कार्तिकस्वामी जन्मतांच पराक्रमी व दीर्घायुषी असा होता. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको वराहतनुमेत्य भुवं विलेख ह्यन्यो भुवं पुरजये स्वरथीचकार ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७१ ॥

७१. एकानें [ विष्णूनें ] वराहावतार घेऊन दैत्यांनीं पृथ्वी समुद्रांत नेऊन लपवून ठेविली होती तेथून तिला उकरून वर काढिली व दुसऱ्यानें ( शिवानें ) त्याच पृथ्वीला त्रिपुरदहनाच्या वेळीं आपला रथ केला. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एको चलां निजवधूं न शशाक रोद्धुमन्यश्चकार वनितां स्फुटमर्धगात्रे ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७२ ॥

७२. एकजण ( विष्णु ) आपल्या चंचळ स्वभावाच्या बायकोस [ लक्ष्मीस ] आपल्या ताब्यांत ठेवूं शकत नाहीं व दुसरा ( शिव ) आपल्या बायकोस [ पार्वतीस ] आपल्याच डाव्या-

कडील आंगांत उघड रीतीनें बसवून घेतो तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें तुह्मी विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको विभाति नितरां शिखिपिच्छचूडस्त्वन्यो विभाति नितरां नवचंद्रमौलिः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७३ ॥

७३ एकजण ( विष्णु ) कृष्णावतारांत इतर गुराख्यांबरोबर रानांत जातांना आपल्या डोकीवरील मुकुटांत ( पागोट्यांत ) आवडीनें मोराचे पंख खोंवतो व दुसरा [ शिव ] आपल्या मस्तकावर शुक्लपक्षांतील द्वितीयेच्या चंद्राची कला धारण करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्य सूकरजनिः सुलभास्ति हीना ह्यन्यस्य चेच्छरभरूपमतिप्रसिद्धम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७४ ॥

७४. एकानें ( विष्णूनें ) सूकरावतार घेतला होता. सूकर जाति ही पशूंत नीच जाति मानिली आहे हें प्रसिद्ध आहे व दुसरा ( शिव ) शरभावतार घेऊन नृसिंहाचा पराभव करितो. शरभजाति पशूंत सिंहापेक्षां देखील श्रेष्ठ मानिली आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको विभाति भृशमेकमुखांबुजेन ह्यन्यो विभाति भुवि पंचमुखैः प्रसिद्धैः॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७५ ॥

७५. एकाला ( विष्णूला ) एकच मुखकमल असल्यामुळें

तो शोभतो, व दुसरा [ शिव ] सुशोभित असलेल्या कमलासारख्या पांच मुखानीं शोभत आहे ह्मणून पृथ्वीवर त्याची प्रसिद्धि आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकश्चतुर्भुज इति प्रथितस्त्रिलोक्यामन्यो भृशं दशभुजैः प्रथितो जगत्याम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७६ ॥

७६. एकाला ( विष्णूला ) चार हात आहेत ह्मणून लोकांत प्रसिद्धि आहे आणि दुसऱ्याला ( शिवाला ) दहा हात आहेत ह्मणून प्रसिद्धि आहे, तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

पंचायुधप्रबलशक्तिमुपैति चैकः सर्वायुधप्रबलशक्तिमुपैति चान्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७७ ॥

७७. एकाला ( विष्णूला ) पांच आयुधें ( शंख, चक्र, गदा, खड्ग, व शार्ङ्ग धनुष्य ) असल्यास त्याला युद्ध करण्याला ज्यास्ती शक्ति येऊन तो सर्वांस अजिंक्य होतो, व दुसऱ्याला ( शिवाला ) सर्व प्रकारचीं [ कोणतेंही ] आयुध असलें तरी चालतें त्या आयुधामुळें तो सर्वांस अजिंक्य होतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको मुमूर्च्छ गहने च किरातबाणादन्यो ह्यमूर्च्छय दुरुत्रिपुरस्थदैत्यान् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७८ ॥

७८. एकजण ( विष्णु ) कृष्णावतारांत निजधामास जाव-

याच्या वेळीं वनांत निजला असतां पारध्यानें मारलेला बाण पायास लागून मूर्च्छित झाला व पुढें त्याच आजारानें तो मरण पावला. दुसरा [ शिव ] त्रिपुरांत लपून राहिलेल्या मोठमोठ्या कमलाक्ष, तारकाक्ष वीरविद्युन्माली वगैरे दैत्यांस बाणप्रहारांनीं मूर्छित करितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकस्तु चक्रमधिगम्य ररक्ष लोकांश्चक्रप्रदः पुररिपुः सुरचक्रवर्ती, ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ७९ ॥

७९. एकजण [ विष्णु ] सुदर्शनचक्र शंकराकडून घेऊन लोकांचें रक्षण करितो व दुसरा ( शिव ) त्या विष्णूला तेंच सुदर्शनचक्र देतो व तो सार्वभौमही आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्त्रिपादिति भृशं जगति प्रसिद्धो ह्यन्यस्य सेवकजनोऽपि तदा प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८० ॥

८०. एकजण ( विष्णु ) त्रिविक्रम [ तीन पाय असणारा ] ह्मणून प्रसिद्ध आहे, व दुसऱ्याचा ( शिवाचा ) भक्त भृंगी तीन पायाचा ह्मणून प्रसिद्ध आहे तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकस्तु साधु हयवक्त्र इति प्रसिद्धो ह्यन्यस्य पुत्र इभवक्त्र इति प्रसिद्धः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८१ ॥

८१. एकाची [ विष्णूची ] हयग्रीव ( घोड्यासारखें तोंड )

ह्या नांवानें प्रसिद्धि आहे [ विष्णूनें हयग्रीव अवतार घेतलेला हो-ता ] व दुसऱ्याला ( शिवाला ) गजवक्त्र ( हत्तीचें तोंड असले-ला ) गजानन नांवाचा मुलगा आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आ-श्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकस्य भाति चतुरानन एव सूनुरन्यस्य भाति हि षडानन एव सूनुः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८२ ॥

८२. एकाला ( विष्णूला ) चार तोंडें असणारा ब्रह्मदेव नांवाचा मुलगा आहे, व दुसऱ्याला शिवाला सहा तोंडें असणारा [ कार्तिकेय ] नांवाचा मुलगा आहे. तेव्हां या दोघांत अधिक कोण ? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

आदाय वेदमदिशद्विधये पुरैकोऽन्यो वेदवाजिषु विधिं विदधे स सूतम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८३ ॥

८३. एकजणानें ( विष्णूनें ) मत्स्यावतारांत शंखासुरास मारून वेद आणून ब्रह्मदेवास दिले व दुसऱ्यानें ( शिवानें ) त्रिपुरदहनाचे वेळीं वेदाचे घोडे करून ते पृथ्वीरूप रथास जुं-पून त्यावर ब्रह्मदेवास सारथी केलें. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आ-श्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एको जघान नरकं सुतरामिहैकमन्यो जघान नरकान्सुतरामनेकान् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८४ ॥

८४. एकजण ( विष्णु ) वराहावतारांत नरकासुर नां-

वाच्या दैत्याचा नाश करितो, व दुसरा (शिव) अनेक नारकीजीवांचा नरकांतून उद्धार करितो, व अनेक नरकांचा नाश करितो. तेव्हां या दोवांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. (त्यालाच शरण जाऊं.)

एकस्तु याचकबलिं च पुनर्ययाच ह्यन्यो ददाविह परत्र च सौख्यमेव ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८५ ॥

८५. एकजण [विष्णु] बलिदैत्यापुढें याचक होऊन वरचेवर त्याजवळ याचना करितो, व दुसरा (शिव) आपल्या भक्तांस ह्या लोकीं व परलोकीं अत्यंत सुख देतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. (त्यालाच शरण जाऊं.)

ग्राहं निहत्य करिराजमरक्षदेको मृत्युं निहत्य मुनिपुत्रमरक्षदन्यः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८६ ॥

८६. एकानें [विष्णूनें] कृष्णावतारांत (नक्रापासून गजेंद्रास सोडविलें,) व दुसऱ्यानें (शिवानें) यमधर्माचा पराभव करून त्यापासून मृकंडुऋषीच्या पुत्राचें (मार्कण्डेय याचें) रक्षण केलें. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [त्यालाच शरण जाऊं.]

एकः पपौ स्तनरसं विषतोऽप्येवमन्यः पपौ भुवनभीकरकालकूटम् ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८७ ॥

८७. एकजण (विष्णु) कृष्णावतारांत कपटरूपानें आ-

ळेल्या पूतनाराक्षसीच्या स्तनांतील विषमिश्रित दूध प्याला, व दुसरा ( शिव ) सर्व त्रैलोक्यास भयंकर वाटणाऱ्या कालकूट विष प्याला. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मीं त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

भक्तेन केनचिदवंधयदाब्धिमेको भक्तेन केनचिदपीतयदब्धिमन्यः ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ८८ ॥

८८. एकजण [ विष्णु ] रामावतारांत आपल्या भक्ताकडून [ नल नांवाच्या वानराकडून ] इतर वानरांच्या सहाय्यानें समुद्रावर सेतु बांधवितो, व दुसरा [ शिव ] आपल्या भक्ताकडून ( अगस्त्यऋषीकडून ) सर्व समुद्र पिऊन टाकवितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. [ त्यालाच शरण जाऊं. ]

एकोऽवधीद्रिपुगणं च कृतावतारः शत्रून् जयेति च परः समदादनुज्ञाम् ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमायश्रामः ॥ ८९ ॥

८९. एकजण ( विष्णु ) स्वतः दहा अवतार घेऊन शत्रूंच्या समुदायास मारतो, व दुसरा ( शिव ) "तूं शत्रूंस जिंकशील" असा आपल्या भक्तांस आशीर्वाद देतो, त्या आशीर्वादाचे सामर्थ्यानें त्या भक्तांकडून त्यांच्या शत्रूंचा नाश करवितो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकोऽर्जुनस्य जयदः खलु सूतभावादन्योऽर्जुनस्य जयदोऽभवदस्त्रदानात् ॥ को वानयोराधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ९० ॥

९०. एकजण ( विष्णु ) कृष्णावतारांत अर्जुनाचें सार-

थ्यकर्म करून त्यास जय मिळवून देतो, व दुसरा [ शिव ] अर्जुनास हटकून जय मिळेल असें आपलें पाशुपतास्त्र त्याची भक्ति पाहून त्यास दान देतो, त्यामुळेंच अर्जुनाचा सर्वत्र विजय होतो. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एको व्यधात्तृणमिवाद्रिवरं सुमेरुं गोवर्धनाद्रिमितरस्तु करे दधानः ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ९१ ॥

९१. एकानें ( शिवानें ) सर्व पर्वतापेक्षां मोठा अशा मेरुपर्वतास गवताच्या काडीसारखें उचलिलें, व दुसऱ्यानें ( विष्णूनें ) कृष्णावतारांत गोवर्धनपर्वतास आपल्या हातानें उचलिलें, तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

एकं द्विजातिमखिलेषु सुरेषु मध्ये क्षत्रं परं तु परमार्थविदो वदंति ॥ को वानयोरधिक इत्यनुचिंत्य वृद्धाः सत्यं वदंतु तमिमं वयमाश्रयामः ॥ ९२ ॥

९२. परमार्थ ( तत्व ) जाणणारे ऋषीश्वर ज्ञाते लोक एकाला [ शिवाला ] सर्व देवांत ब्राह्मण ह्मणून मानतात, व दुसऱ्याला ( विष्णूला ) क्षत्रिय ह्मणून मानतात. तेव्हां या दोघांत अधिक कोण? हें विचार करून खरें सांगा ह्मणजे आह्मी त्याचाच आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

अद्वैतमेव भजनीयमतोऽप्रमेयं नित्यं निरंजनमनाकृतिनिर्विकल्पम् ॥ सत्यं परात्परमखंडचिदात्मभावमानंदमच्युतमजं तमिहाश्रयामः ॥ ९३ ॥

९३. ज्याला द्वैतभाव नाहीं त्याचीच उपासना करावी.

यास्तव अद्वैत असा देव कोण आहे याचा पुरता विचार केला पाहिजे, तो नित्य असून निरंजन [ निर्दोष ] असावा, निराकार असून विकल्परहित असावा, तो सत्य असून श्रेष्ठाहून श्रेष्ठ असावा, परिपूर्ण असून चिद्रूप व आनंदरूप असावा, त्याला जन्म व मरण नसावें त्या देवाचा आह्मी आश्रय करूं. ( त्यालाच शरण जाऊं. )

श्रीकांतनामविबुधेंद्रतनूभवेन रामेश्वराध्वरसुधामणिना प्रणीतम् ॥ लोके त्विदं हरिहरास्थिततारतम्यं सत्साधिकं हि शतकं सुधियः पठंतु ॥ ९४ ॥

९४. श्रीकांत नांवाचे कोणी मोठे विद्वान् होते, त्यांचे पुत्र रामेश्वरपंडित ह्यांनीं हें हरिहरतारतम्य नांवाचें शंभर श्लोकांचें काव्य केलें आहे. पृथ्वीवरील विद्वान् लोकांनीं हें वाचावें आणि त्यावरून विष्णु श्रेष्ठ किंवा शिव श्रेष्ठ याचा विचार करावा.

॥ इति हरिहरतारतम्यं समाप्तम् ॥



समाप्त.